राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कार्यरत आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तकांच्या मोबदल्यात वाढ करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बैठक-०२१९/प्र.क्र.१६९/आरोग्य -७**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : १७ जुलै, २०२०.

**वाचा :-**

शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.बैठक-०२१९/प्र.क्र.१६९/आरोग्य-७, दिनांक १६ सप्टेंबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यक्रमांतर्गत राज्यात आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक कार्यरत आहेत. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना, निकष व दराप्रमाणे राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत प्रकल्प अंमलबजावणी आराखडयात मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून आशा स्वयंसेविकांना व गटप्रवर्तकांना राष्ट्रीय आरोग्य अभियानात नेमून दिलेल्या एकूण ७८ सेवा केल्यास त्या सेवेस केंद्र शासनाने निर्धारित केल्याप्रमाणे मोबदला दिला जातो. आशा स्वयंसेविकांना देण्यात येत असलेल्या मोबदल्यात वाढ करण्याबाबत उपरोक्त वाचा येथील दिनांक १६ सप्टेंबर, २०१९ च्या शासन निर्णयान्वये केंद्र सरकारच्या मार्गदर्शक सूचनांनूसार एकूण ७८ सेवांपैकी नियमित ४ कामांसाठी आशा स्वयंसेविकांना राष्ट्रीय आरोग्य अभियानातून दरमहा रु.२०००/- मोबदल्यात वाढ करण्यास मंत्रीमंडळाच्या विहित मान्यतेच्या अधीन राहून शासनाची तत्वत: मान्यता देण्यात आली होती.

तथापि, राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यक्रमांतर्गत आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक ह्या दोन्ही घटकांच्या भूमिका महत्वाच्या असल्यामुळे त्यांना दिल्या जाणाऱ्या मोबदल्यात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

या अनुषंगाने दिनांक २५ जून, २०२० रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीत आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांची राष्ट्रीय आरोग्य अभियानातील शेवटच्या घटकापर्यंत आरोग्य सेवा पोहचविण्यातील भूमिका व महत्व विचारात घेऊन आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना राज्य शासनाच्या निधीतून मोबदला देण्याबाबत शासनाने पुढीप्रमाणे निर्णय घेतले आहेत.:-

१. आशा स्वयंसेविकांना केंद्र शासनाकडून नियमित ४ कामांसाठी प्राप्त होणाऱ्या मोबदल्याच्या समप्रमाणात कमाल रु.२०००/- पर्यंत दरमहा तसेच गटप्रवर्तकांना (ASHA Facilitator) रु.३०००/- दरमहा राज्य शासनाच्या निधीतून मोबदला देण्यास मंजुरी देण्यात येत आहे.
२. या प्रयोजनार्थ येणाऱ्या वार्षिक आवर्ती सरासरी वित्तीय खर्च रु.१७०.०० कोटी फक्त (रुपये एकशे सत्तर कोटी फक्त) यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. या प्रयोजनार्थ वार्षिक आवर्ती खर्चासाठी चालू आर्थिक वर्षात पुरवणी मागणीद्वारे वित्तीय तरतुद करण्यात येत आहे.

०३. सदर योजना सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात दिनांक ०१.०७.२०२० पासून अंमलात येईल व त्यानुसार आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तकांना सदर वाढीव मोबदला दिनांक ०१.०७.२०२० पासून अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०४. तसेच यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्यात येत आहे. वित्तीय तरतुद व लेखाशीर्ष याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

०५. सदर शासन निर्णय, नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ ४०४/व्यय-१३, दिनांक ०२.०१.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७१७१५२०२१६२१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2020.07.17 15:05:11 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.राज्यपालांचे सचिव (५ प्रती) (पत्राने)
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव (५ प्रती), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
३. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानसभा व विधानपरिषद सदस्य.
६. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
७. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
८. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
९. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१०.प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
११.सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
१२.महाप्रबंधक, मा.मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.
१३.प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
१४.प्रबंधक, मा.लोकायुक्त व मा.उप लोकायुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई.
१५.प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
१६.मा.मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई.
१७.वित्त विभाग/ व्यय-१३, मंत्रालय, मुंबई.
१८. नियोजन विभाग/कार्यासन १४७२, मंत्रालय, मुंबई.
१९.सर्व विभागीय आयुक्त

२०.आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२१.सर्व जिल्हाधिकारी,
२२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२३.संचालक (आरोग्य सेवा-१), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
२४.संचालक (आरोग्य सेवा-२), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
२५.अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई.
२६.अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, माताबाल संगोपन व शालेय आरोग्य, पुणे.
२७.उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
२८. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
२९.सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी, (FWB मार्फत)
३०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३१.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
३२.वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
३३.सर्व कोषागार अधिकारी
३४.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती)
३५. भारतीय जनता पाटी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरेक नं.१, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-४०००२०.
३६.इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०००२५.
३७.राष्ट्रवादी कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रपती भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पाईंट, मुंबई-४०००२१.
३८. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४००००१.
३९.बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-४००००१.
४०.भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई.
४१.भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई.
४२.सार्वजनिक आरोग्य विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई-४००००१.
४३.निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-७)